**डॉ. बाबासाहेब आंबेडकर उत्कृष्ट ग्रंथालय पुरस्कार व डॉ.एस. आर. रंगनाथन उत्कृष्ट ग्रंथालय कार्यकर्ता व सेवक (ग्रंथमित्र) पुरस्कार २०२२-२३ या पुरस्कारासाठी निधी वितरीत करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक-मराग्र २०२४/प्र.क्र.११२/ई-८१७०२५/ग्रं.क.,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १३ ऑगस्ट, २०२४.

**वाचा** : १) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. मराग्रं-२०२२/प्र.क्र.६०/ग्रंथालय कक्ष, दि.१६.११.२०२३.
२) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. मराग्रं-२०२४/प्र.क्र.१०८/ ई-८११११११/ग्रंथालय कक्ष, दि.०५.०८.२०२४.
३) ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय यांचे पत्र जा.क्र.५२/निधी/ पुरस्कार/ २०२४-२५/ २८८४-८५, दि.२६.०७.२०२४.
४) शासन ज्ञापन उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक-मराग्र २०२४/प्र.क्र.११३/ ई-८१७०३९/ग्रं.क., दि.१३ ऑगस्ट, २०२४.

**ज्ञापन** :

डॉ. बाबासाहेब आंबेडकर उत्कृष्ट ग्रंथालय पुरस्कार तसेच ग्रंथालय चळवळीतील कार्यकर्ते व सेवक यांना डॉ. एस. आर. रंगनाथन उत्कृष्ट ग्रंथालय कार्यकर्ता व सेवक (ग्रंथमित्र) पुरस्काराबाबत उपरोक्त वाचा क्र.१ येथील शासन निर्णयान्वये अटी, निकष, निवड प्रक्रिया याबाबतची कार्यपध्दती निश्चित करण्यात आली आहे. त्यानुषंगाने उक्त वाचा क्र. २ येथील शासन निर्णयान्वये शासनमान्यता प्राप्त सार्वजनिक ग्रंथालयांना २०२२-२३ या वर्षासाठी डॉ. बाबासाहेब आंबेडकर उत्कृष्ट सार्वजनिक ग्रंथालय एकूण ६ पुरस्कार आणि सार्वजनिक ग्रंथालय चळवळीतील योगदानाबद्दल डॉ एस.आर.रंगनाथन उत्कृष्ट ग्रंथालय कार्यकर्ता व सेवक (ग्रंथमित्र) १४ पुरस्कार असे एकूण २० पुरस्कार जाहिर करण्यात आले आहेत.

०२. डॉ. बाबासाहेब आंबेडकर उत्कृष्ट ग्रंथालय पुरस्कार व डॉ.एस. आर. रंगनाथन उत्कृष्ट ग्रंथालय कार्यकर्ता व सेवक (ग्रंथमित्र) पुरस्कार २०२२-२३ या पुरस्कार वितरण सोहळयासाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये उक्त वाचा क्र. ४ येथील शासन ज्ञापनान्वये मागणी क्रमांक डब्लू-४, २२०५ कला व संस्कृती या लेखाशीर्षांतर्गत २१ सामग्री व पुरवठा या उद्दीष्ट शीर्षामधून ०५, बक्षीसे या उद्दीष्ट शीर्षामध्ये रु.५,४८,०००/- एवढा निधी पूनर्वितरण करण्यात आला आहे. त्यानुसार, ग्रंथालय संचालनालयाच्या उक्त वाचा क्र. ३ येथील प्रस्तावाच्या अनुषंगाने रु. १५,४८,०००/- ( रूपये पंधरा लक्ष अठ्ठेचाळीस

हजार रुपये फक्त) इतका निधी वितरीत व खर्च करण्यास ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

अ) सदर निधी खर्च करण्यासाठी लेखाधिकारी, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य यांना “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, सदर खर्चाकरीता “नियंत्रक अधिकारी” म्हणून संचालक ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई हे राहतील.

आ) सदर खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र ग्रंथालय संचालक यांनी सादर करणे आवश्यक आहे.

०३. सदर पुरस्कार वितरण सोहळ्यासाठीचा खर्च मागणी क्रमांक डब्लू-४ २२०५, कला व संस्कृती, १०५, सार्वजनिक ग्रथालये, (०१) ग्रंथालय संचालनालय, (०१)(०१) ग्रंथालय संचालनालय (अनिवार्य), लेखाशीर्ष २२०५०२५१ अंतर्गत ०५ बक्षिसे उद्दिष्टशीर्षाखाली सन २०२४-२५ वर्षामध्ये उपलब्ध अर्थसंकल्पीय तरतूदीतून वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

०४. सदर शासन ज्ञापन वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.८८१/व्यय-५, दि. ०९.०८.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

०५. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्र.२०२४०८१३१२२६३३७५०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PRATAP PANDURANG LUBAL

Digitally signed by PRATAP PANDURANG LUBAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=b0d6763338fc6cc4f7cf07ca60db7abc1cfac99c84ab1b5bfc0dae4609d631d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AF6895C47A84066432F5BDD1F182B4163D880AC9BD8D24A198FD0E7310BBEB59, cn=PRATAP PANDURANG LUBAL
Date: 2024.08.13 12:41:54 +05'30'

**( प्रताप पां.लुबाळ )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव (उच्च व तंत्र शिक्षण विभाग), मंत्रालय, मुंबई-३२.
३. महालेखापाल-१ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. अवर सचिव, (व्यय-५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७. अवर सचिव, (अर्थसंकल्प कक्ष), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती (ग्रं.क.), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय,मुंबई.